सन २०१६-१७ करीता इको टुरि झम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांच्या विकास कामांकरिता निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१६/ प्र.क्र.५१ (१) /फ- ५**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक :- ३१ जानेवारी २०१७.

वाचा - १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३(१६-१७)/१९९६/१६-१७,दि. २१/१/२०१७ व दि.३०.०१.२०१७

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२०.४.२०१६.

**प्रस्तावना -**

अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी संदर्भ क्र.१, दि. २१/१/२०१७ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ करिता इको टुरीझम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांचा विकास या योजनेंतर्गत पुणे वनवृत्तातील मौजे वारजे भांबूर्डा ता. हवेली जि. पुणे येथील ४ हेक्टर प्रथम वर्षीय बांधील कामाकरिता रुपये २५.६५ लक्षचा चालू बाब प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार राज्य योजना सन २०१६-१७ करीता इको टुरीझम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांचा विकास (२४०६-२२९५) या योजनेअंतर्गत पुणे वनवृत्तातील मौजे वारजे भांबूर्डा ता. हवेली जि. पुणे येथील प्रथम वर्षीय बांधील कामाकरिता रुपये २५.६५ लक्ष निधी मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार पुणे वनवृत्तातील मौजे वारजे भांबूर्डा ता. हवेली जि. पुणे येथील प्रथम वर्षीय बांधील कामाकरिता रुपये २५.६५ लक्ष (पंचवीस लक्ष पासष्ठ हजार फक्त) इतक्या रक्कमेस खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव | ०२-मजुरी | २१- पुरवठा व सामग्री | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | मौजे वारजे भांबूर्डा ता. हवेली जि. पुणे येथील प्रथम वर्षीय बांधील कामे | रू.२०.५२ | रु. ५.१३ | रू.२५.६५ |

सदरहू शासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१. उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे याची खात्री करुनच कामे करावीत. तसेच सदरहू कामे करताना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुद्धा दक्षता घ्यावी.

३. शासन निर्णयात नमुद कामासाठी इतर स्त्रोतातुन निधी घेण्यात येणार नाही व कामाची द्विरुक्ती होणार नाही याचे प्रमाणपत्र उपयोगिता प्रमाणपत्रासोबत द्यावे त्याशिवाय पुढील निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घ्यावी.

४. सदर प्रस्तावांतर्गत करावयाच्या कामाचा खर्च रु. २५.६५ लक्ष हा सन २०१६-१७ साठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांचे अधिनस्त उपलब्ध अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३११७२७१५२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.02.01 12:33:01 +05'30'

**( प्रकाश महाजन)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर

(२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर

(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर

(४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर

(५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.

(६) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.

(७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

(८)कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम)/, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

(९) ब-१/फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग ,मंत्रालय, मुंबई.

(१०) निवड नस्ती, फ-५